सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय तथा सह धर्मादाय आयुक्त कार्यालय,यवतमाळ या कार्यालयाच्या रु. १७८.७५ लक्ष इतक्या रकमेच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएचसी -१११६/३०१/(१६६/१६)/का.१७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- १५ एप्रिल , २०१७**

**संदर्भ** : धर्मादाय आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.मालमत्ता शाखा/४१४३/२०१६, दि.०४.०८.२०१६

**प्रस्तावना :-**

जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ येथील नवीन प्रशासकीय इमारतीतील वरच्या (दुस-या) मजल्यावरील ५०००चौ.फूट जागेवर बांधकाम करण्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयाने सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय तथा सह धर्मादाय आयुक्त कार्यालय, यवतमाळ यांना परवानगी दिली आहे. सदर जागेवर२ हॉल, पॅसेज, कॅरिडॉर,डब्ल्यूसी, रेन/रुफ वॉटर हार्वेस्टींग, फायर फायटींग सिस्टीम, वॉटर पंप इत्यादी बांधकाम करावयाचे आहे:-

अ) सदर अंदाजपत्रक सन २०१६-१७ च्या दरसूचीवर आधारित आहे.

ब) हे अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सा.बां.वि., क्र.१ यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,यवतमाळ यांनी साक्षांकीत केले आहेत. अंदाजपत्रकानुसार ५४२.०३ चौ.मी.चे बांधकाम करावयाचे असून त्यात बांधकामावरील जलरोधक, रेन वॉटर हार्वेस्टींग, वॉटर पंप, फर्निचर, विद्युतीकरण, पाणी पुरवठा व मलनि:सारण इत्यादींचा समावेश करण्यात आला आहे.

क) अंदाजपत्रकात भविष्यातील भाववाढीसाठी व व्हॅटसाठी ही तरतूद करण्यात आली आहे.

उपरोक्त जागेवरील बांधकामाच्या रु.१,२८,१९,०००/-इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांच्या तपासणीनंतर सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय तथा सह धर्मादाय आयुक्त कार्यालय, यवतमाळ या कार्यालयाच्या कार्यालयीन इमारत बांधकामाच्या रुपये १७८.७५ लक्ष (रुपये एक कोटी अठ्ठयात्तर लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ तसेच उपभोक्ता विभागाच्या

वतीने सक्षम अधिकाऱ्याकडून अंदाजपत्रक साक्षांकित करुन घेणे आवश्यक राहील, या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या संदर्भातील सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय यांनी तयार केलेली RECAPITULATION SHEET (Construction of २nd floor to Administrative Building, behind Grahak Manch,Dist.,Yavatmal) या शासन निर्णयासोबत जोडण्यात येत आहे.

[२. हे आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५ च्या शासन निर्णयातील भाग एक उप विभाग-५, अ.क्र. ३ व सा.बां.विभागाच्या नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ नुसार किरकोळ व नागरी बांधकामांना स्थापत्य कामासाठी प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२/इमा-२, दि.३.१.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

३. या बांधकामाचा खर्च धर्मादाय आयुक्त कार्यालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील सार्वजनिक न्यास प्रशासन निधीतून करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१५१५१५५५२७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सहपत्रः-Recapitulation sheet

Sandhya Bageshwar

Digitally signed by Sandhya Bageshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d4a8d57e69da6499480bc974f18dca56ad5541c4795df9434c3e826318ec8ea, cn=Sandhya Bageshwar
Date: 2017.04.15 15:17:59 +05'30'

**( सं. अ. बागेश्वर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत अग्रेषित,**

१. मा. आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, वरळी मुंबई-४०० ०१८
२. सह धर्मादाय आयुक्त तथा सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, यवतमाळ.
३. अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ
५. कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग / इमारती-२, मंत्रालय, मुंबई.
६. कार्या.२३ व १, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती, का.१७.

५

Sheet1

**Name of Work: Construction of 2nd Floor to Administrative Building behind Grahak Manch, Yavatmal Distt. Yavatmal**

**RECAPITULATION SHEET**

**(A) Essential Items**

| Sr. no. | Items | | Cost Rs. |
|---|---|---|---|
| 1 | **Building proper** | | |
| | | **Second Floor** | |
| | | Area of building (sqmt) | 542.03 |
| | | Rate of Const. ( including waterproofing) | 19,000 |
| | | **cost of construction** | 1,02,98,570 |
| 2 | **Electrification** | Internal (5% of cost of building proper) | 5,14,929 |
| | | External (6% of cost of building proper) | 6,17,914 |
| 3 | Water Supply & sanitation (5% of cost of building proper) | | 5,14,929 |
| 4 | Furniture ( @ Rs. 2000/- Per Sqm ) | | 10,84,060 |
| 5 | Rain Water Harvesting Lump Sum | | 2,00,000 |
| 6 | Fire Fighting Arrangements Lump Sum | | 1,00,000 |
| | | **Sub Total** | **1,33,30,401** |
| | Contingencies (4%) | | 4,11,943 |
| | Escalation (10%) | | 13,33,040 |
| | Service Tax ( 15% on 40% of Construction cost) | | 7,99,824 |
| | | **Total** | **1,58,75,208** |

**(B) Optional items**

| Sr. no. | Items | | Cost Rs. |
|---|---|---|---|
| 1 | Lift | | 10,00,000 |
| 2 | Air Conditioning | | 10,00,000 |
| (B) | | **Subtotal** | **20,00,000** |
| | **TOTAL COST OF PROJECT = ( A + B )** | | **1,78,75,208** |
| | | **Say Rs Lakhs** | **178.75** |